**घरगुती गॅसचा अवैध वापर रोखण्याच्या अनुषंगाने राज्यातील गॅस एजन्सींच्या तपासण्या करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः घगॅस-२०१८/प्र.क्र.४२२/ना.पु.२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई
दिनांक: १० डिसेंबर, २०१८.

वाचा:
१) शा.नि.क्र.पेट्रोल १३११/प्रक्र ३५२/नापु-२४, दि.३१.०१.२०११
२) शा.नि.क्र.पेट्रोल १३११/प्रक्र ३५२/नापु-२४, दि.१९.०७.२०११
३) शा.प.क्र.संकीर्ण २६११/प्रक्र ६२/नापु २७, दि.२७.०४.२०११
४) शा.प.क्र.संकीर्ण १०१२/१०/प्रक्र १०/नापु ३१, दि.१२.०१.२०१२

**प्रस्तावना:**

राज्यातील पेट्रोलियम पदार्थांशी निगडित अनियमिततांना पायबंद घालण्याच्या हेतूने पेट्रोलियम पदार्थांच्या नियमित तपासण्या / धाडी करण्याबाबतच्या सूचना संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ व २ अन्वये सर्व क्षेत्रिय कार्यालयांना देण्यात आलेल्या आहेत. तसेच राज्यात सार्वजनिक वितरण व्यवस्थेत अंतर्गत जीवनावश्यक वस्तूंचा अपहार/ गैरवापर होऊ नये यास्तव राज्यातील रास्तभाव दुकाने व केरोसिन परवानाधारक यांच्या नियमित तपासण्या तसेच अचानक तपासण्या / धाडी करण्याबाबतच्या सूचना संदर्भाधीन शासन परिपत्रक क्र.३ व ४ अन्वये सर्व क्षेत्रिय कार्यालयांना देण्यात आलेल्या आहेत. तथापि, राज्यात घरगुती गॅसचा अवैध वापर होत असल्याबाबतच्या काही घटना शासनाच्या निदर्शनास आल्या आहेत. सबब, केरोसिन व इतर पेट्रोलियम पदार्थांप्रमाणे घरगुती गॅसच्या अवैध वापरासही आळा बसावा व ते पात्र लाभार्थ्यांना उपलब्ध व्हावे यास्तव राज्यातील गॅस एजन्सींच्या नियमित /अचानक तपासण्या करणे आवश्यक आहे.

**शासन परिपत्रक:**

राज्यात सार्वजनिक वितरण व्यवस्थेत अंतर्गत जीवनावश्यक वस्तूंचा अपहार/ गैरवापर होऊ नये यास्तव राज्यातील रास्तभाव दुकाने व केरोसिन परवानाधारक यांच्या नियमित तपासण्या तसेच अचानक तपासण्या / धाडी करण्याबाबतच्या सूचना संदर्भाधीन शासन परिपत्रक क्र. ३ व ४ अन्वये सर्व क्षेत्रिय कार्यालयांना देण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार जिल्हयातील / शिधावाटप क्षेत्रातील प्रत्येक रास्तभाव दुकान व केरोसिन परवानाधारकाची सहा महिन्यातून किमान एकदा तपासणी होईल याप्रमाणे तपासणी मोहिम राबविण्यात येते. त्याधर्तीवरच केरोसिन व रास्तभाव दुकान परवान्यांच्या तपासण्या करताना जिल्हयातील / शिधावाटप क्षेत्रातील प्रत्येक गॅस एजन्सींची सहा महिन्यातून किमान एकदा तपासणी होईल याप्रमाणे तपासणी मोहिम राबविण्यात यावी, तसेच

अचानक तपासण्या / धाडी देखील करण्यात याव्यात. क्षेत्रिय अधिका-यांचे गॅस एजन्सी तपासणीसाठी विहीत मानकांप्रमाणे रोष्टर बनविण्यात यावे व प्रत्येक क्षेत्रिय अधिका-याने दिलेल्या इष्टांकाप्रमाणे गॅस एजन्सींच्या तपासण्या पूर्ण कराव्यात. प्रत्येक क्षेत्रिय अधिका-याला दरमहाचे तपासणी इष्टांक ठरवून द्यावे. सदर इष्टांक तालुका, जिल्हा तसेच अधिकारीनिहाय निश्चित करुन तपासण्या कराव्यात.

२. सर्व क्षेत्रिय अधिकाऱ्यांना नियमित तपासण्यांचे दरमहा इष्टांक ठरवून देताना प्रत्येक गॅस एजन्सीची दर सहामाही कालावधीत किमान एकवेळ व वर्षातून किमान दोन वेळा तपासणी होईल याप्रमाणे उप आयुक्त (पुरवठा) व जिल्हाधिकारी यांनी नियोजन करावे. तसेच नियमित तपासण्यां व्यतिरिक्त घरगुती गॅसच्या अवैध वापरबाबत प्राप्त तक्रारींच्या अनुषंगाने आकस्मिक तपासण्या व धाडीही करण्यात याव्यात. सदर आकस्मिक तपासण्या व धाडी या नियमित तपासण्यांसाठी असणाऱ्या इष्टांका व्यतिरिक्त असतील.

३. जीवनावश्यक वस्तू अधिनियम, १९५५ व लिक्विफाईड पेट्रोलियम गॅस (रेस्ट्रिक्शन ऑन युज ॲण्ड फिक्सेशन ऑफ सेलिंग प्राईस ) ऑर्डर, २००० मधील तपासणी संबंधातील विहीत केलेल्या तरतुदींनुसार धाडी /तपासणीबाबतची कार्यवाही करण्यात यावी. तपासण्यांमध्ये आढळून आलेल्या दोषीं विरुध्द उक्त अधिनियम व आदेशांमधील तरतुदींनुसार कारवाई करण्यात यावी. तसेच घरगुती गॅसचा वापर व्यावसायिक प्रयोजनांकरीता होणार नाही, याबाबत दक्षता घेण्यात यावी.

४. सदर तपासण्यांबाबतचा अहवाल दरमहा ५ तारखेपर्यंत शासनास सोबतच्या प्रपत्रानुसार सादर करावा.

५. घरगुती गॅस एजन्सींच्या व गॅसच्या अवैध वापराबाबत विहित मानांकाप्रमाणे तपासणी न करणा-या अधिकारी/कर्मचारी यांच्यावर संबंधित जिल्हाधिकारी व उपायुक्त (पुरवठा) यांनी महाराष्ट्र नागरी सेवा नियमानुसार शिस्तभंगाची कारवाई करावी.

६. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१०११३२२७७९०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2018.12.10 11:40:03 +05'30'

**( भा.बा.पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई.

२. मा. विरोधी पक्षनेता, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई.

३. सर्व सन्मानीय विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानसभा.

४. सर्व सन्माननीय विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानपरिषद.

५. नियंत्रक शिधावाटप व संचालक नागरी पुरवठा, मुंबई.

६. सर्व जिल्हाधिकारी

७. सर्व उप आयुक्त (पुरवठा).

८. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.

९. सर्व अन्न धान्य वितरण अधिकारी.

१०.सर्व उप नियंत्रक शिधावाटप,मुंबई.

११. मा.मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.

१२. मा.राज्यमंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.

१३. निवडनस्ती.

शासन परिपत्रक क्रमांकः घगॅस-२०१८/प्र.क्र.४२२/ ना.पु.**२७,**दि. १० डिसेंबर, २०१८ चे विवरणपत्र

| जिल्हा | गॅस एजन्सींची संख्या | तपासण्या / धाडींची संख्या | जप्त माल | जप्त मालाचे मूल्य | दाखल गुन्हयांची संख्या | अटक व्यक्तींची संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | |
| | | | | | | |
| | | | | | | |